आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या वर्षात "लहान पाटबंधारे" योजनेकरीता निधी वितरण.
लेखाशीर्ष (४७०२ ७७२१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र. ११/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०८ फेब्रुवारी, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.०१.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग शा.नि क्र बीयुडी-२०२१/प्र.क्र.११/कार्यासन-६, दि.२८.१२.२०२१.
३) मृद व जलसंधारण विभागाची नस्ती क्र. आउयो-२०२१/प्र.क्र.४१८/जल-४

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मृद व जलसंधारण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या राज्य एकत्रित निधीअंतर्गत लहान पाटबंधारे योजनेंतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतुदींमधून नाशिक जिल्हयातील त्र्यंबकेश्वर तालुक्यातील मौजे देवगाव येथील उपसा सिंचन योजनेसाठी रु.१५०.०० लाख इतका निधी वितरीत करण्याबाबत जलसंधारण विभागाकडून संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावांस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-६, मधील मुख्य लेखाशीर्ष ४७०२, लहान पाटबंधाऱ्यांवरील भांडवली खर्च, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (१८)-राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना (४७०२ ७७२१), ५३-मोठी बांधकामे यासाठी सन २०२१-२२ या वर्षात रु.७५००.०० लाख तरतूद अर्थसंकल्पित आहे. **नाशिक जिल्हयातील त्र्यंबकेश्वर तालुक्यातील मौजे देवगाव येथील उपसा सिंचन योजनेसाठी रु.१५०.०० लाख** इतका निधी मृद व जलसंधारण विभाग यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.१५०.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, मृद व जलसंधारण विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. विभागप्रमुख/नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१ व दि.२८.०१.२०२२ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४.  सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५.  नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६.  सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.१ येथील शासन निर्णयान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१२४१२५८१५५६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.02.09 12:07:29 +05'30'

**(रविंद्र औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
६. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
७. कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई.
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.